**महाराष्ट्र - कर्नाटक सीमा प्रश्न आंदोलनातील हुतात्म्यांच्या वारसांना निवृत्ती वेतन व इतर आर्थिक लाभ-....**

**वित्तीय वर्ष २०१७-१८ मधील एप्रिल व मे, २०१७ या २ महिन्यांकरिता लेखानुदानाचे वाटप**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक : बियुडी-१८१७/९८/प्र.क्र.२९/२०१७/३६**
मंत्रालय, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मुंबई - ४०० ०३२
दिनांक : २० एप्रिल, २०१७

**संदर्भ :-**

१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.बियुडी-१८१४/प्र.क्र.९६/२०१४/३६, दि.२१/०४/२०१५.
२) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्र.बीयुडी-२०१७/प्र.क्र.७०/२०१७/२५, दि.०५/०४/२०१७.

**शासन परिपत्रक :-**

महाराष्ट्र विधानमंडळाने सन २०१७-१८ च्या संपूर्ण अर्थसंकल्पास विधानमंडळाची मंजुरी मिळेपर्यंत माहे एप्रिल ते मे, २०१७ या दोन महिन्यांचा खर्च भागविण्यासाठी "महाराष्ट्र विनियोजन (लेखानुदान) विधेयक, २०१७ मंजूर करण्यात आले असून ते महाराष्ट्र अधिनियम क्रमांक-८ म्हणून, राजपत्र असाधारण भाग-४, दि. २९ मार्च, २०१७ मध्ये प्रसिध्द करण्यात आले आहे. सदर अधिनियमान्वये विधानमंडळाने मंजूर केलेले अनुदान सन २०१७-१८ या आर्थिक वर्षाच्या कालावधीतील पहिल्या दोन महिन्यांसाठी म्हणजेच सन २०१७-१८ च्या अर्थसंकल्पीय अंदाजामध्ये नमूद केलेली मागणी अंतिमरित्या संमत करेपर्यंतच्या कालावधीसाठी विविध लेखाशीर्षाखाली होणारा संभाव्य खर्च भागविता यावा यासाठी आहे.

२. **"मागणी** क्र.ए-५, २२३५ - सामाजिक सुरक्षा व कल्याण, ६०-इतर सामाजिक सुरक्षा व कल्याण कार्यक्रम - १०२ - सामाजिक सुरक्षा योजनेखाली निवृती वेतन - (००) (०३) महाराष्ट्र कर्नाटक सीमा आंदोलनातील हुतात्म्यांचे वारसांना निवृत्ती वेतन (२२३५ २४९३)" या लेखाशीर्षाअंतर्गत **सन २०१७-१८**या वित्तीय वर्षासाठी **एकूण रु.१७,५७,०००/- (रुपये सतरा लक्ष सत्तावन्न हजार फक्त)** एवढी अर्थसंकल्पीय तरतूद मंजूर करण्यात आलेली आहे. त्यापैकी संदर्भ क्र.२ येथील दि.०५/०४/२०१७ च्या शासन परिपत्रकान्वये **पहिल्या दोन महिन्यांकरीता (एप्रिल व मे, २०१७) रु.२,९३,०००/- (रुपये दोन लक्ष त्र्याण्णव हजार फक्त)** एवढी रक्कम लेखानुदानाद्वारे उपलब्ध करुन देण्यात आली आहे.

३. संदर्भाधीन दि.२१.४.२०१५ च्या शासन निर्णयान्वये महाराष्ट्र - कर्नाटक सीमा आंदोलनातील हुतात्म्यांच्या वारसांना स्वातंत्र्य सैनिकांप्रमाणेच रु.१०,०००/- दरमहा एवढे निवृत्तीवेतन अनुज्ञेय आहे. सबब, प्राप्त लेखानुदानामधून **माहे एप्रिल व मे, २०१७** या **२** महिन्यांचा खर्च भागविण्याकरीता **रु.२,८७,०००/- (रुपये दोन लक्ष सत्त्याऐंशी हजार फक्त)** इतके अनुदान महाराष्ट्र-कर्नाटक सीमा आंदोलनातील हुतात्म्यांच्या वारसांना निवृत्तीवेतन व अन्य लाभ अदा करण्यासाठी संबंधित जिल्हाधिकारी यांना पुढील तक्त्यात नमूद केल्याप्रमाणे वितरित करण्यात येत आहे :-

| अ. क्र. | जिल्हाधिकारी (लाभार्थ्यांची संख्या) | सन २०१७-१८ एकूण अर्थसंकल्पीय अनुदान (रुपये) | एप्रिल व मे,२०१७ या कालावधीसाठी वितरित केलेला निधी | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | | | निवृत्तीवेतन (दरमहा रु.१०,०००/- प्रत्येकी प्रमाणे) एप्रिल,२०१७ साठी वितरीत अनुदान (रुपये) | निवृत्तीवेतन (दरमहा रु.१०,०००/- प्रत्येकी प्रमाणे) मे,२०१७ साठी वितरीत अनुदान (रुपये) | प्रवासभत्ता (प्रत्येकी रु.५००/- वार्षिक प्रमाणे) (मे, २०१७ मध्ये उपलब्ध) (रुपये) | एकूण वितरीत अनुदान (रुपये) (४+५+६) |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| १ | मुंबई शहर (३) | -- | ३०,००० | ३०,००० | १५०० | ६१,५०० |
| २ | कोल्हापूर (९) | -- | ९०,००० | ९०,००० | ४,५०० | १,८४,५०० |
| ३ | पुणे (१) | -- | १०,००० | १०,००० | ५०० | २०,५०० |
| ४ | रत्नागिरी (१) | -- | १०,००० | १०,००० | ५०० | २०,५०० |
| | **एकूण अनुदान** | **१७,५७,०००** | **१,४०,०००** | **१,४०,०००** | **७,०००** | **२,८७,०००** |

४. **सदर लेखानुदान पुढील अटींच्या अधीन राहून वितरीत करण्यात येत आहे:-**

१) **एप्रिल व मे, २०१७** या **२** महिन्यांचा खर्च संबंधित जिल्हाधिकारी यांनी त्यांना वितरीत केलेल्या तरतूदी इतका मर्यादित ठेवावा.

२) संबंधित जिल्हाधिकारी यांनी उक्त बाबीवर होणाऱ्या खर्चाची वेगळी नोंद ठेवून महालेखापाल कार्यालयामधील खर्चाच्या नोंदीशी ताळमेळ घालून त्याचे विवरणपत्र सामान्य प्रशासन विभाग/कार्यासन-२५ व वित्त विभाग यांच्याकडे विहित मुदतीत पाठवावे व त्याची प्रत या कार्यासनास देखिल पाठवावी. कुठल्याही परिस्थितीत २२३५२४९३ या लेखाशीर्षाखालीच रकमा खर्ची पडत असल्याची व त्याबाबत खर्चमेळाद्वारे खातरजमा करण्याची जबाबदारी संबंधित जिल्हाधिकारी यांची राहील, याची कृपया नोंद घ्यावी.

५. हे परिपत्रक सामान्य प्रशासन विभागाचे परिपत्रक क्र. बीयुडी-२०१७/प्र.क्र.७०/२०१७/२५, दि.०५/०४/२०१७ मधील सूचनांनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

हे परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०१७०४२०१२१३१६५००७ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात आले आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sanjay Krishna Bhosale

Digitally signed by Sanjay Krishna Bhosale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=68fad25d7626a3cc798a2cdee2480a108e46d2bc3c24f98d38cc78723fe79c0f, cn=Sanjay Krishna Bhosale
Date: 2017.04.29 16:10:41 +05'30'

**(सं. कृ. भोसले)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत, माहिती व आवश्यक कार्यवाहीसाठी रवाना :-

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र- १, मुंबई.

२. महालेखापाल (लेखा परीक्षा) महाराष्ट्र- १, मुंबई.
३. संचालक, लेखा व कोषागारे (संगणक शाखा), मुंबई.
४. प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. सचिव, लेखा व कोषागरे, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. जिल्हाधिकारी, मुंबई शहर जिल्हा, जुने जकात गृह, फोर्ट, मुंबई-२३.
७. जिल्हाधिकारी, कोल्हापूर.
८. जिल्हाधिकारी, पुणे.
९. जिल्हाधिकारी, रत्नागिरी.
१०. जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर जिल्हा, वांद्रे (पूर्व), मुंबई-५१ यांना असे कळविण्यात येते की, त्यांना आवश्यक असलेले अनुदान जिल्हाधिकारी, मुंबई शहर यांच्याकडून मागविण्यात यावे.
११. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१२. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
१३. जिल्हा कोषागार अधिकारी, कोल्हापूर.
१४. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
१५. जिल्हा कोषागार अधिकारी, रत्नागिरी.
१६. सामान्य प्रशासन विभाग/कार्यासन-२५, मंत्रालय, मुंबई.
१७. निवड नस्ती (कार्या.३६).